





इतर मागास बहुजन कल्याण विभाग
मंत्रालय (विस्तार), पहिला मजला
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२

दुरध्वनी क्र.-०२२-२२८२३८२०    ईमेल-prakash.dhawale६७@nic.in

---

क्रमांक-विभशा-२०२१/प्र.क्र.०२/विजाभज-२    दिनांक:-१४/०१/२०२२.

वाचा:-

१) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक-अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.२९/०९/२०१८.
२) शासन निर्णय इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्रमांक-विभशा-२०१९/प्र.क्र.७०९/विजाभज-२, दि.१९/०८/२०१९.
३) शासन निर्णय इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्रमांक-विभशा-२०१९/प्र.क्र.७०९/विजाभज-२, दि.१९/०५/२०२०.
४) सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, नांदेड यांचे पत्र क्रमांक-सआसकना/आशा/प्रा.रिसनगाव/सानुग्रह अनुदान मंजुरीबाबत/२०२०-२१/६३८२, दि.२/११/२०२०.
५) कै.घाडगे उर्मिला ज्ञानोबा यांचे नामनिर्देशित व्यक्ती/कायदेशीर वारसदार श्री.रामदास प्रभाकर आगलावे यांचा परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सानुग्रह अनुदान मिळण्याबाबतचा दि.३१/०७/२०१९ रोजीचा अर्ज.

## आदेश

उपरोक्त संदर्भ क्र.०४ च्या पत्रान्वये सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, नांदेड यांचेकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावासोबत श्री.रामदास प्रभाकर आगलावे यांच्या संदर्भ क्र. ०५ येथे नमूद केलेल्या अर्जाच्या अनुषंगाने प्रशासकीय विभाग प्रमुख हे त्यांना संदर्भ क्र.०१ येथील शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक-अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.२९/०९/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार श्रीसंत शिरोमणी मन्मथ स्वामी शिक्षण प्रसारक मंडळ, शेवडी (बा) ता. लोहा, जि. नांदेड संचलित प्राथमिक आश्रमशाळा रिसनगाव ता. लोहा, जि. नांदेड येथे -सहशिक्षिका॰ या पदावर कार्यरत असलेले कै.घाडगे उर्मिला ज्ञानोबा यांचे नामनिर्देशित व्यक्ती/कायदेशीर १)पती, श्री.रामदास प्रभाकर आगलावे, २)मुलगा,चि.आदित्य रामदास आगलावे व ३) मुलगा, चि.व्यंकटेश रामदास आगलावे यांना सानुग्रह अनुदान रुपये १०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा लाख फक्त) समप्रमाणात मंजूर करीत आहेत.

कै.घाडगे उर्मिला ज्ञानोबा ह्या दि.६/०८/२००७ पासून संबंधित आश्रमशाळेत कार्यरत होत्या. सेवेत कार्यरत असताना १० वर्षे सेवा पूर्ण होण्यापुर्वी दि.६/०२/२०१५ रोजी मृत्यू पावल्यामुळे सदर "सानुग्रह अनुदान" मंजूर करण्यात येत आहे. सदर आदेश या आदेशाच्या दिनांकापासून १ वर्षे कालावधीसाठी ग्राह्य राहतील.

सदरचा खर्च "मागणी क्र.जी-६,२०७१-निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ ०१ नागरी, १०३, अनुकंपा भत्ते,(००)(०९)- विजाभज प्रवर्गाच्या प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक खाजगी अनुदानित आश्रमशाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांच्यासाठी परिभाषित अंशदान/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सानुग्रह अनुदान (अनिवार्य)(२०७१०७६७)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२२०११४१३१४४५६१२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c550dd52f3943153bdbd47e381bb9818c91359bd0588e1b35b3c0c18ad7bf938, pseudonym=B6DDBEDBC1E63E4332429DB625320D8F56899C89, serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2022.01.14 13:15:19 +05'30'

**( कैलास साळुंके )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) महालेखापाल, महाराष्ट्र १/ २ (लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर.
३) प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, लातूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड.
५) सहायक आयुक्त, समाज कल्याण,नांदेड.
६) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) श्री.रामदास प्रभाकर आगलावे, रा.चिलका, ता.अहमदपूर, जि.लातूर यांना सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, नांदेड यांचेमार्फत माहितस्तव
८) निवडनस्ती/विजाभज-२.